वैद्यकीय व तत्सम महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजनेंतर्गत निधी वितरण.
(लेखाशीर्ष २२२५ ३५२९)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/ कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : -३० मार्च,२०२२.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/कार्या-६, १८.०६.२०२१, दि.०१.०९.२०२१ व दि.१.११.२०२१.
३. शासन ज्ञापन, आदिवासी विकास विभाग, क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.३३/का-६, दि.३०.०३.२०२२.
४. आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. व्यशिप्र-२०२१ /प्र.क्र.७६/कार्या-१२.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत वैद्यकीय व तत्सम महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजना राबविण्यात येते. सदर योजनेकरीता सन २०२१-२२ यावर्षात रू.३०००.०० लाख इतका निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत करण्यात आला आहे. या योजनेंतर्गत सन २०१९-२० ते सन २०२१-२२ या वर्षातील प्रलंबित अर्जांकरीता वाढीव रू.२४.९१ कोटी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करून देण्याबाबत संदर्भाधीन क्र.४ येथील नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन वाढीव निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत वैद्यकीय व तत्सम महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०१९-२० ते सन २०२१-२२ या वर्षातील प्रलंबित अर्जांकरीता वित्त विभागाच्या मान्यतेने खालीलप्रमाणे वाढीव निधी योजनेचे नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२१-२२ अर्थसंकल्पित तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| वैद्यकीय व तत्सम महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती | २२२५ ३५२९ | ३४, शिष्यवृत्ती/ विद्यावेतने | ३०००.०० | २४९१.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.२४९१.०० लाख (अक्षरी रुपये चोविस कोटी एक्कावन्न लाख फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षनिहाय/ उपलेखाशीर्षनिहाय शिष्यवृत्ती अदा करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांचा तपशील, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३५०/व्यय-१४, दि.२८.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२९१३३७५६१०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.30 18:45:38 +05'30'

(रविंद्र दि. औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
५. सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मीक आदिवासी विकास प्रकल्प.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.